ज्येष्ठ कवी वि.वा शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांचा दिनांक २७ फेब्रुवारी हा जन्मदिवस "मराठी भाषा गौरव दिन" या कार्यक्रमास प्रसिध्दी देण्याकरिता जाहिरात व प्रसिध्द माध्यम आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मभादि-२०२५/प्र.क्र.३०/भाषा-३**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २०.०२.२०२५

वाचा :- १) शासन परिपत्रक क्रमांक :मभादि-२०२४/प्र.क्र.१५१/भाषा-३, दि.०६.०१.२०२५
२) माहिती व जनसंपर्क जनसंचालनालयाचे माध्यम आराखडा नियोजन व अमंलबजावणी समितीच्या दि.१७.०२.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

मराठी भाषेचा प्रचार, प्रसार, जतन व संवर्धन हे मराठी भाषा विभागाचे मुख्य धोरण आहे. वि.वा.शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांनी महाराष्ट्राच्या सांस्कृतिक क्षेत्रामध्ये मोलाचे योगदान दिले असून, मराठी भाषा ही ज्ञानभाषा होण्यासाठी अथक परिश्रम घेतले आहेत. त्यानुषंगाने आपल्या मातृभाषेचा गौरव म्हणून वि.वा.शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांचा दिनांक २७ फेब्रुवारी हा जन्मदिन "मराठी भाषा गौरव दिन" म्हणून साजरा करण्याच्या सूचना संदर्भ क्र.१ येथील दिनांक ०६.०१.२०२५ च्या शासन परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत.

ज्येष्ठ कवी कुसुमाग्रज तथा वि. वा. शिरवाडकर ह्यांचा २७ फेब्रुवारी हा जन्मदिवस "मराठी भाषा गौरव दिन" म्हणून दर वर्षी महाराष्ट्र शासनाद्वारे साजरा करण्यात येतो. मराठी भाषा गौरव दिनानिमित्त विंदा करंदीकर जीवन गौरव पुरस्कार, श्री.पु.भागवत उत्कृष्ट प्रकाशन संस्था, यशवंतराव चव्हाण राज्य वाङमय पुरस्कार, मंगेश पाडगावकर व अशोक केळकर भाषा संवर्धन पुरस्कार प्रदान करण्यात येतात. तसेच राज्य मराठी विकास संस्थेमार्फत सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन करण्यात येते. सदर कार्यक्रमासाठी राज्य मराठी विकास संस्थेच्या लेखाशीर्ष-२२०५३२०५ अंतर्गत रु.१ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१३ ऑगस्ट,२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासकीय जाहिराती वितरण धोरणाच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांना प्रसिध्दी देण्याकरीता रु.९९,८४,०००/- कोटी रक्कमेच्या माध्यम आराखड्यास माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यम आराखडा व नियोजन समितीच्या संदर्भ क्र.२ येथील दि.१७ फेब्रुवारी २०२५ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. सदर आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

आपल्या मातृभाषेचा गौरव म्हणून वि.वा.शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांचा दिनांक २७ फेब्रुवारी हा जन्मदिन "मराठी भाषा गौरव दिन" म्हणून साजरा करण्याच्या अनुषंगाने सदर कार्यक्रमास व्यापक प्रसिध्दी देणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यम आराखडा नियोजन व अमंलबजावणी समितीच्या दि. १७ फेब्रुवारी २०२५ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आलेल्या माध्यम आराखड्यास तसेच तो राबविण्यासाठी येणाऱ्या रु. ९९,८४,०००/- इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. या प्रचार व प्रसिध्दी माध्यम आराखड्यानुसार येणाऱ्या अंदाजित खर्चाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

**माहिती व जनसंपर्क महासंचालनालय**

**मराठी भाषा विभाग (मराठी भाषा गौरव दिन २०२५) प्रस्तावित माध्यम आराखडा (बैठक दिनांक १७.२.२०२५**

**जाहिरात प्रसिद्धी तपशील (Details of Advertisement)**

| क्र. | Media | मूळ दर, प्रक्रिया | Details | वारंवारिता | संख्या/ दिवस | एकूण अंदाजित रक्कम (सर्व करांसहित) |
|---|---|---|---|---|---|---|
| | **बाह्य माध्यमे (प्रदर्शने शाखा)** | | | | | |
| १ | मराठी भाषा विभागामार्फत दि.२७ फेब्रुवारी, २०२५ या कालावधीत गेटवे ऑफ इंडिया, मुंबई येथे कार्यक्रमाचे आयोजन | शा.नि. दि.२३ नोव्हेंबर, २०२३ अन्वये नियुक्त संस्थांच्या सूचीमधील संस्थांकडून विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन संस्था नियुक्त करण्याचे प्रस्तावित. | मराठी भाषा विभाग यांच्या दि.१४ फेब्रुवारी, २०२५ रोजीच्या पत्रामध्ये नमूद केलेल्या कामाची व्याप्ती (Scope of Work) नुसार ई-निविदा मागविण्यात याव्यात | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | १ दिवस | ९६,००,००० |
| | | | **Total** | | | **९६,००,०००** |
| १ | शा.नि. दि. १३.८.२०२१ नुसार रु.५.०० कोटी इतक्या रकमेपर्यंतच्या प्रसिद्धी आराखड्यासाठी एकूण खर्चाच्या ४% (रु.२० लाख) आणि त्यापेक्षा प्रत्येक वाढीव रकमेसाठी २% (उर्वरित रकमेवर (रु.५ कोटी वजाजाता)) प्रमाणे | शासन निर्णय तरतुदीनुसार | माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाला येणारा कार्यालयीन उपकरणावरील खर्च, सॉफ्टअवेर, तात्पुरता मनुष्यबळावरील खर्च, संशोधन खर्च, वाहतूक खर्च, इतर किरकोळ खर्च | | | ३,८४,००० |
| | | | | | **TOTAL EXPENDITURE** | **९९,८४,०००** |

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने या अनुषंगाने संबंधित जाहिरात एजन्सी/आस्थापनांना कार्यादेश देण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी. तसेच माहिती व जनसंपर्क संचालनालयामार्फत संस्था निवड करुन कार्यादेश दिल्यानंतर माध्यम आराखडयानुसार निर्मिती करावयाच्या सर्व प्रकारच्या जाहिराती मराठी भाषा विभागामार्फत अंतिम केल्यानंतरच सदर जाहिरात संस्थांना प्रसिध्द करता येऊ शकेल. त्याचबरोबर विभागाकडून देयके पारित करताना कार्यादेश आणि वित्तीय देयकासोबत जोडण्यात आलेल्या कामाच्या तपशिलानुसार व माहिती जनसंपर्क महासंचालनालयाने कार्यादेशसोबत व माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजावणी समितीच्या बैठकीच्या इतिवृत्तामध्ये विहित केलेल्या अटी-शर्तीनुसार संबधित संस्थेने काम केले आहे किंवा कसे हे तपासूनच देयके अदा करण्यात येतील.

यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक झेडएफ-०२,२२०५, कला व संस्कृती,१०२ कला व संस्कृती प्रचालन (०२) कार्यक्रम, (०२) (०१) राज्य योजना (कार्यक्रम), (२२०५३२०५) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात राज्य मराठी विकास संस्था यांना मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

प्रस्तुत प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रम राबविण्यासाठी खर्च करताना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/आदेश/परिपत्रके यानुसार तसेच वित्त विभाग,शासन निर्णय क्र.विअप्र-

१०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, दि.१७.०४.२०१५ अन्वये निर्गमित वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील विहित तरतुदींचे अटी व शर्तीचे पालन करुन तसेच खरेदी प्रक्रियेबाबत विहित तरतूदींचे व कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२०१३१४१०५६३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN JOTIRAM DANGARE

Digitally signed by NITIN JOTIRAM DANGARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT,
2.5.4.20=2199314143adc352dccd62da8d57c0c437f1857f98da7b40525225bbbd5b59e9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=EF4BF635C99B4893102C08CC8CC543C45250E19DC2A7932C127A2E60D75F7904, cn=NITIN JOTIRAM DANGARE
Date: 2025.02.20 13:15:41 +05'30'

**( नितिन जो.डंगारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री (विधि व गृह ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री (मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव / विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. मा.समिती प्रमुख व सदस्य, मराठी भाषा समिती, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
८. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०. मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
११. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१५. सचिव (मराठी भाषा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१६. संचालक (माहिती व वृत्त) , माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१७. अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
१८. अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ, नागपूर,
१९. भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई,
२०. संचालक, राज्य मराठी विकास संस्था,मुंबई,
२१. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२२. सर्व अवर सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३. भाषा - ३ (संग्रहार्थ).